नक्षलवादी, अतिरेकी, गुन्हेगार, समाजकंटक इत्यादी समाजविघातक शक्तींविरुध्द कारवाई करताना मृत्यू पावलेले पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना नुकसानभरपाई देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय, क्र.पीडब्ल्यूएक ०१९५/सीआर-१३१/पोल-७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १३ मार्च १९९६.

पहा:- शासन निर्णय, गृह विभाग, क्र.एमआयएस ०४९२/५९८/प्र.क्र.१६६/पोल-३, दिनांक १४ऑक्टोबर, १९९२.

निर्णय:- पोलीसांचे जीवन जोखमीचे असून वाढती गुन्हेगारी, नक्षलवादी व अतिरेकी यांच्या कारवाया यामुळे त्यांच्या जीवाला धोका असतो. स्वत:चा जीव धोक्यात घालून कायदा व सुव्यवस्थेचे रक्षण करणा-या पोलीसांचे मनोधैर्य वाढविण्याच्या दृष्टीने शासन निर्णय, गृह विभाग, क्र.एमआयएस ०४९२/५९८/प्र.क्र.१६६/पोल-३, दिनांक १४ ऑक्टोबर, १९९२ अन्वये महाराष्ट्रात नक्षलवादी किंवा अतिरेकी यांच्याविरुध्दच्या कारवाईत मृत्यू पावलेले पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना दिल्या जाणा-या रु.१,००,०००/- [रुपये एक लाख फक्त] इतक्या नुकसानभरपाईच्या रकमेत वाढ करुन ती रु.२,००,०००/- [रुपये दोन लाख फक्त] इतका करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. तसेच ही रु.२,००,०००/- [रुपये दोन लाख फक्त] इतकी नुकसानभरपाईची रक्कम गुन्हेगार, समाजकंटक, संघटीत गुन्हेगार, इत्यादी समाजविघातक शक्तींविरुध्द कारवाई करतांना मृत्यू पावलेले पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांनाही देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील नक्षलग्रस्त भागात कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांना नक्षलवादी/अतिरेकी यांच्याकडून मृत्यू आल्यास त्यांच्या कुटुंबियांनाही रु.२,००,०००/- [रुपये दोन लाख फक्त] इतकी नुकसानभरपाईची रक्कम देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

३. हा शासन निर्णय दिनांक २८.२.१९९६ पासून अंमलात येईल.

४. पोलीस व शासकीय कर्मचारी यांच्या कुटुंबियांना वरीलप्रमाणे नुकसानभरपाई देण्याचा खर्च लेखाशिर्ष "२०५५,पोलीस-११३, पोलीस कर्मचारी वर्ग यांचे कल्याण-[चार] कर्तव्य बजावीत असताना जखमी अथवा मृत झालेल्या पोलीस कर्मचा-यांना व त्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह अनुदान [२०५५ ०२९ ३] योजनेत्तर" याखालील प्रति वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

कृ.मा.प.

रोटा/एच-1549(1200-3-96)

...२/-

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या मान्यतेने [अनौपचारिक संदर्भ क्र. ७८६/९५/व्यय-७, दिनांक ६.७.१९९५] निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ कु. क. ते. सय्यद ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

१. पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई [१० प्रती],
२. संचालक, अँन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक , गुन्हा अन्वेषण विभाग [गुन्हे], महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग [गुप्तवार्ता], महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. संचालक, पोलीस बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके], महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. विशेष पोलीस महानिरीक्षक [नक्षलवादी प्रतिबंधक कारवाया], महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. प्राचार्य पोलीस अकादमी, नाशिक.
१०. सर्व पोलीस आयुक्त,
११. सर्व पोलीस उप महानिरीक्षक [सर्व परिक्षेत्रे, रेल्वे, राज्य राखीव पोलीस बल, नागरी हक्क संरक्षण, इत्यादी].
१२. सर्व पोलीस अधिक्षक, [जिल्हा, रेल्वे, मोटार परिवहन विभाग, पुणे].
१३. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल,
१४. सर्व प्राचार्य, प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण शाळा,
१५. महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा]-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१९. वित्त विभाग [व्यय-७].
२०. सर्व मंत्रालयीन विभाग.
२१. गृह विभाग [कार्यासन पोल-१ ते १४ व विशा-१अ/१ब ते विशा-८, बीयुडी-१].
२२. निवड नस्ती.

---

एच-1549(1200-3-96)